शासकीय पशुपैदास प्रक्षेत्र, हेटीकुंडी, ता.कारंजा घाडगे, जि.वर्धा या प्रक्षेत्राचे हस्तांतरण महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर या संस्थेकडे करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक- व्हीआयपी-२०१६ /प्र.क्र. १०२/पदुम-४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक ,
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक :- १६ डिसेंबर, २०२१

वाचा :- १) आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.एफवायपी-२१ (२२)/तां.२/ सीआर-२३/२१४५/पसं-६ पुणे, दि.३०.०८.२०२०.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.मपविमं/तांत्रिक/१७७७-७९/२०२१ नागपूर, दि.२०.०७.२०२१.

प्रस्तावना:-

पशु पैदास प्रक्षेत्र हेटीकुंडी, जि.वर्धा या प्रक्षेत्राची स्थापन सन १९४६ मध्ये झालेली असून या प्रक्षेत्रावर देशी शुध्द गवळाऊ जातीच्या जनावरांची जोपासना करणे, गोवंश टिकविणे व शेतकऱ्यांना पशुसंवर्धन विषयक प्रशिक्षण देणे हे मुख्य उद्देश होते. पशुसंवर्धन विभागाच्या पुनर्रचनेचा शासन निर्णय दि.२५.०५.२००४ रोजी निर्गमित झालेला असून या शासन निर्णयान्वये सदरचे प्रक्षेत्र बंद करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला होता. मात्र तत्कालीन मा.मुख्यमंत्री महोदयांनी या निर्णयाला स्थगिती दिलेली आहे. या प्रक्षेत्राकडे पूर्वी ३२७.८० हेक्टर जमिन उपलब्ध होती मात्र दि.२५.०५.२००४ च्या फेरफारनुसार ४०.८० हेक्टर जमीन सर्वे क्र.१०१/१ नुसार या प्रक्षेत्राकडे देण्यात आली व उर्वरीत २८७ हेक्टर जमिन सर्वे क्र.१०१/२ नुसार वन विभागाकडे (चराई हक्क पशुसंवर्धन विभागाकडे) देण्यात आलेली आहे.

दि. २३.०४.२०२० रोजी मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांनी पशुपैदास प्रक्षेत्र हेटीकुंडी, जि. वर्धा येथे दिलेल्या भेटीमध्ये या प्रक्षेत्रावरील रिक्त पदे व मनुष्यबळ नसल्यामुळे सदरचे प्रक्षेत्र महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर यांच्याकडे हस्तांतरीत करण्याचे निर्देश दिलेले आहेत.

सदर प्रक्षेत्राचा विकास, वैरण उत्पादन व गवळाऊ या जातीचे जतन व संवर्धन करण्यासाठी सदर प्रक्षेत्राचे हस्तांतरण महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाकडे करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णय:-

शासकीय पशुपैदास प्रक्षेत्र, हेटीकुंडी, ता.कारंजा घाडगे, जि.वर्धा या प्रक्षेत्राचे आहे त्या स्थितीत हस्तांतरण महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ या संस्थेकडे करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर प्रक्षेत्राच्या विकासासाठी शासनाकडून निधी उपलब्ध होणार नसल्याने महाराष्ट्र पशुधन विकास मंडळाने त्यांच्या स्वउत्पन्नातून सदर प्रक्षेत्राचा विकास, वैरण उत्पादन व गवळाऊ या गोवंश जातीचे जतन व संवर्धन करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२७१७१२२६४९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आलेला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,**

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2021.12.27 17:15:01 +05'30'

**( डॉ. संजय वि. डोईजोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई .
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
६. जिल्हाधिकारी, वर्धा
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर.
९. संचालक (संशोधन), महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
११. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, नागपूर
१२. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, नागपूर.
१३. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
१४. अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.निवड नस्ती (पदुम-४).